सन २०१६-१७ करीता इको टुरि झम (राज्य) योजनेंतर्गत वनक्षेत्रातील पर्यटन स्थळांच्या विकास कामांकरीता निधी वितरण. (२४०६ २२९५)

**महाराष्ट्र शासन**

**महसुल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : निसप-२०१६/ प्र.क्र. ८७ (भाग-७) /फ- ५**

मंत्रालय, मुंबई -४००० ०३२

दिनांक :- २३ डिसेंबर, २०१६

**वाचा** - १) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य,नागपूर यांचे पत्र क्रं. कक्ष-१/ पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.२३(१६-१७)/१६३६/१६-१७,दि. ३०/११/२०१६.

**प्रस्तावना -**

अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य नागपूर यांनी संदर्भीय दि. ३०/११/२०१६ च्या पत्रान्वये सन २०१६-१७ करिता इको टुरीझम (राज्य) योजनेंतर्गत वनक्षेत्रातील पर्यटन स्थळांचा विकास या योजनेंतर्गत नागपूर वनवृत्तातील सेमिनरी हिल्स या पर्यटन स्थळाचा विकास करण्यासाठी एकुण रुपये ५१.५९ लक्ष इतक्या निधीचा प्रस्ताव सादर केला आहे.

शासन निर्णय दि.२८.०१.२०१६ अन्वये महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळाच्या उपविधी नियमांना मान्यता देण्यात आली असून त्यामध्ये व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन मंडळ, नागपूर यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या कार्यकारी समितीने नागपूर वनवृत्तातील, सेमिनरी हिल्स या पर्यटन स्थळाच्या विकास कामांना निधी उपलब्ध करून देण्याची शिफारस केली आहे.

राज्य योजना सन २०१६-१७ करीता इको टुरीझम (राज्य) योजनेंतर्गत वनक्षेत्रातील पर्यटन स्थळांचा विकास (२४०६-२२९५) या योजनेअंतर्गत रू. ४७२४.८८ लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित असून पुरवणी मागणीद्वारे रु. ९५०.०० लक्ष निधी प्राप्त झाला आहे. या निधीतून प्रस्तावित पर्यटन स्थळाचा विकास करण्यासाठी निधी मंजुर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

अपर प्रधान मुख्य वन संरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य,नागपुर यांनी प्रस्तावित केल्यानुसार नागपूर वनवृत्तातील, सेमिनरी हिल्स या पर्यटन स्थळाचा विकास करण्यासाठी **रू. ५१.५९ लक्ष (एक्कावन लाख एकोणसाठ हजार फक्त** ) इतक्या रक्कमेस पुढीलप्रमाणे उद्दिष्ट निहाय खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रक्कम लाखात)

| अ. क्र. | पर्यटन स्थळाचे नाव | ०२ मजुरी | २१ पुरवठा व सामग्री | ५० इतर खर्च | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| १ | सेमिनरी हिल्स नागपूर | रु. २५.८० | रु. १२.९० | रु. १२.८९ | रु. ५१.५९ |
| | **एकूण** | रु. २५.८० | रु. १२.९० | रु. १२.८९ | रु. ५१.५९ |

सदरहू शासकीय मान्यता पुढील अटींच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

१. उपरोक्त खर्च विहीत कार्यपद्धतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.तसेच सदरहू विकासाची कामे सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात पूर्ण करण्यात यावीत. सदरहू रक्कम खर्ची पडल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

२. प्रस्तावित कामातील उद्यान सुशोभीकरण यासारख्या कामांमध्ये लोखंडी साहित्याऐवजी निसर्गपूरक असलेले साहित्य (उदा.बांबू इ.) चा जास्तीत जास्त वापर करावा व त्या अनुषंगिकच निधी खर्ची पडेल याची दक्षता घ्यावी.

३. **प्रस्तावित सर्व कामांना सक्षम प्राधिकारी यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी आहे याची खात्री करुनच कामे करावीत**. तसेच सदरहू कामे करताना वन (संवर्धन) कायदा १९८०, भारतीय वन अधिनियम १९२७, वन्यजीव (संरक्षण) अधिनियम १९७२ मधील तरतुदींचा भंग होणार नाही तसेच सर्वोच्च न्यायालय/उच्च न्यायालय/केंद्र शासनाच्या व्याघ्र संवर्धन प्राधिकरण यांनी दिलेल्या मार्गदर्शक सुचना/आदेशांची अवहेलना होणार नाही याची सुद्धा दक्षता घ्यावी.

४. शासन निर्णयात नमुद कामासाठी इतर स्त्रोतातुन निधी घेण्यात येणार नाही व कामाची द्विरुक्ती होणार नाही याचे प्रमाणपत्र उपयोगिता प्रमाणपत्रासोबत द्यावे त्याशिवाय पुढील निधी उपलब्ध करुन दिला जाणार नाही याची नोंद घ्यावी.

५. सदर प्रस्तावांतर्गत करावयाच्या कामाचा खर्च **रू. ५१.५९ (एक्कावन लाख एकोणसाठ हजार फक्त )** हा सन २०१६-१७ साठी मागणी क्र. सी-०७-२४०६ वनीकरण व वन्यजीवन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२)(०६) इको टुरिझम (राज्य) (२४०६-२२९५) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

सदरहू शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६ /प्र.क्र.८९/अर्थ-३ दि.२० एप्रिल, २०१६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२२३१२०३२०३११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil N. Dhas

Digitally signed by Anil N. Dhas
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=699d21cc89897191099434d443603426329c81b1b292ed2d168c892811118cc7, cn=Anil N. Dhas
Date: 2016.12.23 12:08:41 +05'30'

**( अनिल धस )**
कक्ष अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति,**

(१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) , महाराष्ट्र राज्य, नागपूर

(२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) , महाराष्ट्र राज्य, नागपूर

(३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य, नागपूर

(४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळ, नागपूर

(५) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), नागपूर.

(६) महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर.

(७) जिल्हा कोषागार अधिकारी, ), नागपूर.

(८)कक्ष अधिकारी (व्यय-१०)(विनियम)/, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

(९) ब-१/फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग ,मंत्रालय, मुंबई.

(१०) निवड नस्ती, फ-५